<u>वन महोत्सव २०२०-२१</u>
वन महोत्सव कालावधीत करावयाच्या
रोपांच्या वाटप व विक्री दराबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. सावि-२०२०/प्र.क्र.४३/फ-११,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- १५ /०६/२०२०**

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. वनम -२०१६/प्र.क्र.७१/फ-११ दिनांक : ४ जून, २०१६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सा.व.वि-२०१९/प्र.क्र.५४/फ-११ दिनांक : १५ जून २०१९.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा. क्र. कक्ष- ३ (ब)/ राहसे/१२३ सन २०२०-२१ दि. ०४/०६/२०२०
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वन बलप्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र जा. क्र. कक्ष- १ / रोहयो/प्र. क्र. १४ (भाग-३) /३२/२०-२१ दि. १५/०६/२०२०

<u>प्रस्तावना :-</u>

दि. १५ जून ते ३० सप्टेंबर, हा काळ वन महोत्सवाचा काळ म्हणून दरवर्षी साजरा करण्यात येतो. या कालावधीत वृक्षलागवडीसाठी लोकांना उद्युक्त करण्याच्या दृष्टीने शासनामार्फत सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा करण्यात येत असतो. वृक्ष लागवड व संगोपन हा लोकांचा कार्यक्रम व्हावा, त्याचबरोबर जनतेला वनीकरणाचे महत्व पटवून देता यावे. या दृष्टीने वन महोत्सवाच्या कालावधीत सवलतीच्या दराप्रमाणे रोपांचा पुरवठा केला जातो. त्यानुसार संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सन २०१९-२० साठी या सुधारित कालावधीनुसार सदर योजना पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. आता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सदर योजना चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१९-२० या वर्षातील अनुभव तसेच जनतेचा प्रतिसाद लक्षात घेवून, ही योजना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात **दिनांक १५ जून २०२० ते ३० सप्टेंबर २०२०** या वन महोत्सवाच्या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास व ती प्रभावीपणे राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यात सन २०१७ पासून “५० कोटी वृक्ष लागवड” हा कार्यक्रम हाती घेण्यात आला होता. सदर कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वर्षासाठी ३३ कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट निश्चित करणेत आले होते. या वृक्षलागवडीचा कार्यक्रम अखंडपणे पुढे ही चालू राहावा यासाठी ‘स्व. वसंतराव नाईक हरित महाराष्ट्र अभियांन’ अंतर्गत खाजगी मालकीचे पडीक क्षेत्र आणि शेत बांधावर, रेल्वे दुतर्फा, कालवा दुतर्फा तसेच रस्ता दुतर्फा क्षेत्रात, सामुहीक पडीक क्षेत्र व गायरान क्षेत्रावर मोठ्या प्रमाणात वृक्ष लागवडीचा कार्यक्रम घेता यावा. सर्वसामान्य शेतकरी व वृक्षप्रेमी यांना अल्पदरात रोपे उपलब्ध व्हावीत यासाठी वनमहोत्सवाच्या कालावधीत सवलतीच्या दरात रोपांचा पुरवठा करण्यात येईल. वन महोत्सवाच्या कालावधीत आणि सर्वसाधारण कालावधीत रोपांचा पुरवठा, सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात खाली नमूद केलेल्या सवलतीच्या दराप्रमाणे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | रोपांचे वर्गीकरण | वनमहोत्सव कालावधीतील रोप विक्रीचे दर प्रति रोप (रूपये) | सर्वसाधारण कालावधीतील प्रति रोपांचे दर (रूपये) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | ९ महिन्याचे रोप (लहान पिशवीतील रोप) | ८/- | १५/- |
| २. | १८ महिन्याचे रोप (मोठ्या पिशवीतील रोप) | ४०/- | ७५/- |

३. राज्यात सन २०२० च्या पावसाळयात १५ जून ते ३० सप्टेबर या कालावधीत वृक्ष लागवड करणेसाठी सर्व शासकीय यंत्रणा व आस्थापना तसेच निमशासकीय यंत्रणा व लोकांना मोठ्या प्रमाणात वृक्ष लागवड कार्यक्रमात सहभाग घेता यावा. यासाठी वरीलप्रमाणे सवलतीचे दरात रोपांचा पुरवठा करण्यात येत आहे.

४. ज्या शासकीय यंत्रणांना वृक्ष लागवड करावयाची आहे, पण त्यांच्याकडे रोप निर्मितीसाठी कोणत्याही प्रकारची आर्थिक तरतूद नसल्यास, अशा यंत्रणांना या वनमहोत्सव कालावधीत रोपांचा मोफत पुरवठा केला जाईल. यासाठी त्यांनी लागणा-या रोपांची आगाऊ मागणी लगतचे उपवनसंरक्षक किंवा विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण विभाग यांचेकडे सोबतच्या मागणी पत्राद्वारे करावी.

५. उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग हे जिल्ह्यात उपलब्ध प्रादेशिक/सामाजिक वनीकरण रोपवाटीकेमधून यंत्रणानिहाय/ मागणीदार यांना रोप पुरवठ्याचे आदेश निर्गमित करतील व इतर यंत्रणेशी योग्य समन्वय साधतील.

६. संदर्भ क्र. १ मधील दि. ०४/०६/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १० मध्ये नमूद केल्याप्रमाणे वनमहोत्सव काळात वन व सामाजिक वनीकरण विभागाच्या रोपवाटीकांमधून सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा केला जातो. या योजनेचा फायदा सर्व संबंधित विभागांनी घ्यावा. जिथे अडचण असेल तिथे वन व सामाजिक वनीकरण विभागाकडून मोफत रोपे देण्याचा प्रयत्न केला जाईल. मात्र त्याबाबतची आवश्यक नोंद आणि लेखा, रोपे उपलब्ध करून घेणारा विभाग आणि रोपे उपलब्ध करून देणारा विभाग अशा दोन्ही विभागामार्फत ठेवण्यात यावा. याबाबतची माहिती व अहवाल प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य यांचेकडे पाठवावी.

७. वनमहोत्सवाच्या कालावधीत (१५ जून ते ३० सप्टेंबर) वनमहोत्सवाचे प्रयोजन व महत्व याबाबत प्रभावीपणे सर्वदूर पोहोचणा-या माध्यमातून योग्य प्रसिद्धी देण्यात यावी. या बाबतचा खर्च "मागणी क्र. सी-७, मुख्य लेखाशिर्ष-२४०६ वनीकरण व वन्यजीवन-१०१-वन संरक्षण व विकास व पुनर्निमीत-(११) (३४) (२४०६ ८५५१) (योजनेंत्तर्गत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२०-२१ वर्षाकरिता मंजूर केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

८. उपवनसंरक्षक, विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण यांनी विक्रीतून एकूण जमा झालेला महसूल याबाबत चालू आर्थिक वर्षाचा तपशिल सोबतच्या विहीत नमुन्यात प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सादर करावा.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६१६१३२२००७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.06.16 13:32:42 +05'30'

**( अरविंद आपटे )**
**सह सचिव**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वन संरक्षक, (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) विभागीय आयुक्त सर्व.
५) मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) सर्व,
५) वन संरक्षक, सामाजिक वनीकरण वृत्त कोकण-ठाणे/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
६) जिल्हा अधिकारी सर्व.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
८) उप वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व.
९) विभागीय वन अधिकारी/ उप विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) सर्व.
१०) विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग (सर्व).
११) सहसंचालक (कृषी), सर्व.
१२) जिल्हा अधिक्षक, कृषी अधिकारी सर्व.
१३) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) कार्यासन अधिकारी, व्यय-०६/अर्थ-१७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
२०) अवर सचिव, फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२१) निवडनस्ती/फ-११.

<u>महसूल व वन विभाग</u>

क्र. सावविे-२०२०-/प्र.क्र.४३/फ-११, दिनांक .१५/०६/२०२० सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | तयार करण्यात आलेल्या एकूण रोपांची संख्या (लाखात) | एकूण विक्री झालेल्या रोपांची संख्या (लाखात) | विक्रीतून वसूल झालेली रक्कम (रुपये हजारात) | शिल्लक राहीलेल्या रोपांची संख्या (लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |

उप वनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी,
सामाजिक वनीकरण विभाग.
जिल्हा ..............

## रोप मागणी पत्र / अर्ज

प्रति,
उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी,
प्रादेशिक विभाग/ सामाजिक वनीकरण विभाग,
.......................जिल्हा

विषय :- इतर शासकीय यंत्रणाद्वारे वृक्ष लागवडी करीता मोफत रोपांचा पुरवठा होणेबाबत.

महोदय,

मी.............................................................................................पदनाम.......... ..............................जिल्हा यंत्रणाप्रमुख..........................प्रमाणित करतो की, शासन निर्णयानुसार वृक्ष लागवडीसाठी आमच्या .................यंत्रणेस............................एवढया ठिकाणी---------एवढे खडडे खोदून ठेवलेले आहेत. तरी वृक्ष लागवडीसाठी ----------रोपांची गरज आहे.

१) सदर रोपे शासकीय दरात घेण्याकरीता आमच्या यंत्रणे जवळ रोपलागवडीकरीता अनुदान उपलब्ध नाही.
२) सदर रोपे खरेदी करीता आम्ही /इतर स्त्रोतातून प्रयत्न केला परंतु निधी उपलब्ध झालेला नाही.
३) आमच्याकडे कार्यालय खर्च व इतर किरकोळ खर्चाकरितासुद्धा अनुदान उपलब्ध नाही.

करीता आम्हाला लागणारी..........................रोपे मोफत उपलब्ध करुन देण्यात यावे ही विनंती. उपलब्ध रोपे स्वतंत्र नोंदवहीमध्ये नोंद घेतली जातील व वरिष्ठ कार्यालयास याबाबत कळविण्यात येईल.

दिनांक

आपला,

स्थान

सही
नाव
पदनाम
जिल्हा